**अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थीनींसाठी बांधलेल्या वसतीगृहांमध्ये सोयीसुविधा पुरविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः वसगृ २०१२/प्र.क्र. १६८/का-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २५ जून, २०१५

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः** अल्पसंख्याक विकास विभाग क्र.वसगृ २००९/प्र.क्र. १५/का-८, दि. २ मार्च २०१०
२) **शासन निर्णय क्रमांकः** अल्पसंख्याक विकास विभाग क्र.वसगृ २०११/प्र.क्र. १३०/का-८, दि. २० डिसेंबर २०११
३) **शासन निर्णय क्रमांकः** अल्पसंख्याक विकास विभाग क्र.वसगृ २०१२/प्र.क्र. १६८/का-८, दि.२१ जून, २०१३
४) **शासन निर्णय क्रमांकः** अल्पसंख्याक विकास विभाग क्र.वसगृ २०१२/प्र.क्र. १६८/का-८, दि. ५ सप्टेंबर, २०१४.

**शासन परिपत्रक -**

उपरोक्त नमूद संदर्भ क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयानुसार अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थिनींकरिता वसतीगृहे बांधण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. तद्नंतर ही वसतीगृहे बांधण्याकरीता सार्वजनिक बांधकाम विभागास संबंधीत जिल्हाधिकाऱ्यांमार्फत अनुदान देण्यात येत आहे. या बांधण्यात येत असलेल्या वसतीगृहाच्या व्यवस्थापनेबाबत संदर्भ क्रमांक ३ व ४ येथील शासन निर्णयाद्वारे कार्यपध्दती निश्चित करण्यात आलेली आहे. सदर वसतीगृहांचे बांधकाम पूर्णत्वास येऊन ते राहण्यायोग्य स्थितीत येतेवेळी खालील सुविधा सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत पुरविण्यात याव्यात.

१) मुलींसाठी आवश्यक सर्व फर्निचर नामांकित कंपनीकडून शासनमान्य दर करारानुसार करण्यात यावा. उदा. गोदरेज, इत्यादि ( प्रत्येक मुलींसाठी एक पलंग, टेबल व खुर्ची, कपाट (भिंतीमध्ये तयार नसेल तर) ,
२) कंपाऊंड वॉल व वॉचमनसाठी केबीन,
३) पार्कींगसाठी शेड,
४) वसतीगृहामधील रिकाम्या जागेत बाग,
५) सर्व खोल्यांमध्ये पडदयांची सुविधा,

६) प्रत्येक मजल्यावर ४० ते ५० लीटर क्षमतेचा ड्रिंकिंग वॉटर कुलर आवश्यकतेनुसार टप्याटप्याने बसविण्यात यावा. सदर खरेदी करतांना शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा. तसेच सदर खरेदी राज्य शासन / केंद्र शासनाच्या यांच्या दर करारानुसार (Rate Contract) करण्यात यावी. उदा. वोल्टास लिमिटेड, ब्ल्यु स्टार लिमिटेड, इत्यादि सुलभ संदर्भाकरिता प्रत सोबत जोडली आहे.

७) या सुविधा वसतीगृह हस्तांतर करण्यापूर्वी पूर्ण कराव्यात.

२. वसतीगृहात विद्यार्थीनिचे प्रवेश झाल्यानंतर आवश्यकतेनुसार प्रत्येक मजल्यावर टप्याटप्याने L.E.D. दूरदर्शन संच (रु.३०,०००/- पर्यत) खरेदी करण्याची कार्यवाही संबंधीत प्राचार्यांनी करावी.

३. प्रत्येक वसतीगृहात जड वस्तू संग्रह नोंदवही ठेवण्यात यावी व त्यामध्ये उपरोक्त वस्तूंची खरेदी होताच नोंद घेण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२५१७४००८८३१४ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ainul C Attar

Digitally signed by Ainul C Attar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ainul C Attar
Date: 2015.06.26 11:38:35 +05'30'

**( अैनुल अत्तार )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
३) महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई,
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), मुंबई,
५) जिल्हाधिकारी, चंद्रपूर, नंदूरबार, औरंगाबाद, परभणी, भंडारा, कोल्हापूर, रायगड, अमरावती, जालना, अकोला, नांदेड, औरंगाबाद, जळगाव, हिंगोली, पुणे, सोलापूर, लातूर, जळगाव व वाशिम.
६) कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद
७) कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ विद्यापीठ,नांदेड
८) कुलसचिव, पंजाबराव कृषी विद्यापीठ, अकोला
९) कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव
१०) कुलसचिव,डॉ. पंजाबराव कृषी विद्यापीठ, अकोला

११) संचालक, तंत्र शिक्षण, मुंबई,

१२) संचालक, उच्च शिक्षण, पुणे

१३) संचालक (प्रशिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, मुंबई,

१४) संचालक, शासकीय विज्ञान संस्था, औरंगाबाद,

१५) प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पूर्णा, जि. परभणी,

१६) संचालक, शासकीय विदर्भ ज्ञान विज्ञान संस्था, अमरावती,

१७) प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, गंगाखेड, जि. परभणी,

१८) प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, परभणी, जि. परभणी,

१९) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, हिंगोली, जि. हिंगोली,

२०) प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था,वसमत, जि. हिंगोली,

२१) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, वाशिम, जि. वाशिम,

२२) प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, मंगळूरपीर, जि. वाशिम

२३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, चंद्रपूर, नंदूरबार, औरंगाबाद, परभणी, भंडारा, कोल्हापूर, रायगड, अमरावती, जालना, अकोला, नांदेड, जळगाव, हिंगोली, पुणे, सोलापूर, लातूर, जळगाव व वाशिम.

२४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

२५) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

२६) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१४), (व्यय-४) मंत्रालय, मुंबई,

२७) नियोजन विभाग, (कार्या-१४७५)

२८) कार्यासन-७, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

२९) निवडनस्ती, का-८